महाराष्ट्र विधानमंडळास वार्षिक अहवाल विहित मुदतीत सादर करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन

संसदीय कार्य विभाग

शासन परिपत्रक क्रमांक-विमंअ-२००८/प्र.क्र.५९/पांच

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक :१५ सप्टेंबर,२००८.

**संदर्भ :** शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग, क्रमांक-एलईजी-१०९८/ प्र.क्र.५१/९८/पांच, दिनांक २ डिसेंबर, १९९८.

## परिपत्रक

विधानमंडळ कामकाज हाताळण्यासंदर्भातील सर्वसमावेशक आदेश या विभागाच्या संदर्भाधिन शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. सदर मार्गदर्शक सूचनांचे सर्व मंत्रालयीन विभागांनी काटेकोरपणे पालन करणे अपेक्षित आहे.

२. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक-४ अन्वये, शासनाचे अंगीकृत व्यवसाय, मंडळे, महामंडळे, स्वायत्त संस्था, कृषि विद्यापीठे इत्यादींचे वार्षिक अहवाल त्यांच्या मंत्रालयातील प्रशासकीय विभागांच्या मंत्रिमहोदयांकडून विधानमंडळाला सादर करताना पुढीलप्रमाणे कार्यपध्दती अनुसरण्याबाबतच्या सूचना देण्यात आल्या आहेत :-

(अ) मंडळे, महामंडळे वगैरेचे जे अहवाल विधानमंडळास सादर करणे आवश्यक असतात असे अहवाल, अहवाल वर्ष समाप्त झाल्याबरोबर ताबडतोब दुसऱ्या वर्षी विधानमंडळास सादर करण्यात यावेत.

(ब) अहवाल सादर करण्यास जर काही **अनिवार्य** कारणामुळे विलंब झाला असेल, तर अहवालाच्या प्रती सभागृहाच्या पटलावर ठेवण्यासाठी विधान मंडळ सचिवालयास पाठवित असताना, अहवाल सादर करण्यास कोणत्या कारणामुळे विलंब झाला आहे आणि हा विलंब टाळणे शक्य होते काय, याबाबतचे स्पष्टीकरण विधान मंडळ सचिवालयास पाठवावे.

(क) ज्यावेळी संबंधित मंत्रिमहोदय विलंब झालेला अहवाल सभागृहाच्या पटलावर ठेवतील, त्यावेळी मंत्रिमहोदयांना संबंधित मंत्रालयीन विभागाने विलंब का झाला याबाबतची माहिती उपलब्ध करुन द्यावी, म्हणजे संबंधित मंत्रिमहोदय विलंबाच्या खुलाशासह अहवाल सभागृहात सादर करु शकतील.

३. तथापि, उपरोक्त सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी केली जात नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे.याबाबतसंदर्भात सन २००८ च्या पहिल्या (अर्थसंकल्पिय) अधिवेशनाच्यादरम्यान महामंडळांचे अहवाल सभागृहापुढे विलंबाने सादर होत असल्याबाबतची बाब काही सन्माननीय विधानसभा सदस्यांनी मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा याच्या निदर्शनास आणली आहे व मा.अध्यक्ष महोदयांनीही अहवाल उशिरा सादर होत असल्याबाबत नाराजी व्यक्त केली आहे. तसेच, मा.मंत्री, संसदीय कार्य यांनीदेखील ज्या महामंडळांचा अहवाल वेळेत येणार नाही, त्यांच्याकडून खुलासा मागितला जाईल आणि

→२.

यासंदर्भातील माहिती सादर केली जाईल. तसेच, यासंदर्भात कडक कारवाई करण्यात येईल, असे सभागृहास आश्वासित केले आहे.

४. सबब, संदर्भाधीन दिनांक २ डिसेंबर,१९९८ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या आदेशांचा पुनरुच्चार करण्यात येऊन, सर्व विभागांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, उपरोक्त परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद केलेल्या निदेशानुसार विहित करण्यात आलेली कार्यपध्दती अनुसरुन, वार्षिक अहवाल विधानमंडळाला सादर करण्याबाबत सर्व संबंधित प्रशासकीय विभागांनी काटेकोरपणे अमलबजावणी करावी व अहवाल विहित कालावधीतच विधानमंडळाला सादर करण्याची दक्षता घ्यावी. तसेच, जर एखादा अहवाल अनिवार्य कारणाशिवाय अन्य कारणांमुळे विधानमंडळास सादर करण्यास विलंब झाला असेल तर, संबंधितांविरुध्द प्रशासकीय विभागाने कडक कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सु.अ.देशपांडे

**( सु.अ.देशपांडे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
५) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
७) निवड नस्ती.